शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड.
"राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत मंजूर अनुदानामधून यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्र.आयुष-२०१९/प्र.क्र.१७/२०/आयु-२
गो.ते.रुग्णालय आवार, ९ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १३ जुलै, २०२०

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१/१२/२०१६.
२) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. आसंमुं/शाआयुरनां/राआअ/यंत्रसामुग्री खरेदी/प्रमा/२०२०/आयु-४(२)/२६१५-१६, दि.१३/०२/२०२०.

**प्रस्तावना :-**

शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड अंतर्गत असलेल्या औषधी परिक्षण प्रयोगशाळेचे बळकटीकरण करण्यासाठी "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत उर्वरीत मंजूर अनुदानामधून यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड येथील औषधी परिक्षण प्रयोगशाळेकरिता "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत रु.७१,१०,१००/- एवढा निधी मंजूर झाला आहे. सदर मंजूर अनुदानामधून औषधी परिक्षण प्रयोगशाळेच्या इमारतीचे नुतनीकरण , यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी तसेच औषधी परिक्षण प्रयोगशाळेसाठी रसायने खरेदी करीता आतापर्यत रु.६६,९३,१८५/- खर्च झालेले असून रुपये ४,१६,९१५/- एवढे अनुदान शिल्लक आहे. शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड औषधी परिक्षण प्रयोगशाळेकरिता खाली नमूद यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्यामुळे रु.४,१६,९१५/- एवढया शिल्लक निधीमधून खरेदी करावयाच्या खाली नमूद केलेल्या रुपये ४,०७,०००/- (अक्षरी रुपये चार लाख सात हजार फक्त) एवढया रक्कमेच्या यंत्रसामुग्री खरेदीच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्रसामुग्रीचे नांव | अंदाजित किंमत | आवश्यक परिमाण | एकूण अंदाजित रक्कम |
|---|---|---|---|---|
| 1. | Digital pH Meter | 35,000/- | 01 | 35,000/- |
| 2. | Digital Analytical Balance | 1,00,000/- | 01 | 1,00,000/- |
| 3. | Digital Tablet Friability Test Apparatus | 90,000/- | 01 | 90,000/- |
| 4. | Digital Multifunctional Machine | 25,000/- | 01 | 25,000/- |
| 5. | Digital Tablets Hardness Tester | 1,00,000/- | 01 | 1,00,000/- |
| 6. | Digital Water Bath | 15,000/- | 01 | 15,000/- |
| 7. | Electric Burner | 3,000/- | 04 | 12,000/- |
| 8. | Rotary Shaking Machine | 30,000/- | 01 | 30,000/- |
| | | | एकूण | 4,07,000/- |
| (अक्षरी रुपये चार लाख सात हजार फक्त) | | | | |

२. उपरोक्त यंत्रसामुग्री व उपकरणे खरेदी "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत प्राप्त निधीमधून करावी. "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजनअंतर्गत प्राप्त अनुदानामधून खरेदी करावयाच्या प्रस्तावित यंत्रसामुग्रीची अंदाजित किंमत रुपये ३.०० लाखाच्या आतील असल्यामुळे, सदर यंत्रसामुग्री व उपकरणे खरेदी ही शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात यावी. तसेच कोणत्याही बाबीतील अनियमितता होणार नाही याची संचालक, आयुष यांच्या कार्यालयासह सर्व संबंधितांनी दक्षता घ्यावी.

३. उपरोक्त प्रयोजनासाठी येणारा खर्च "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत प्राप्त निधीमधून भागविण्यात यावा.

४. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, वित्तीय अधिकार भाग-पहिला, उपविभाग एक ते पाच मधील उपविभाग-दोन (शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्र . एडीआर-२०१६/प्र.क्र.७२/१६/आयु-२, दिनांक ३० ऑक्टोबर,२०१७ अन्वये सुधारीत) मधील अ.क्र.३, नियम क्र.७ (अ) अन्वये (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (खुद्द) करीता व या विभागाच्या अधिपत्याखालील आयुष संचालनालय, मुंबई यांचे अखत्यारीतील सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रदान सुधारित वित्तीय अधिकारा नुसार) विभाग प्रमुख यांना प्राप्त रुपये १०.०० लाखा पर्यंतचे अधिकारास अनुसरुन शासकीय आयुर्वेद रुगणालय, नांदेड या संस्थेस जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सन २०१९-२०२० अंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीमधून वॉशिंग मशिन व ड्रायर रु.८,५१,०००/- (अक्षरी आठ लाख एकावन्न हजार फक्त) किंमतीस खरेदी करण्यास आयुष संचालनालयीन स्तरावर तांत्रिक मान्यता दिली आहे . त्यामुळे उक्त प्राधिकारामधील वार्षिक रुपये १० लाखाची संचालनालयाची मर्यादा विचारात घेता, शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड करिता "राष्ट्रीय आयुष अभियान" या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत मंजूर केंद्रिय अनुदानातील शिल्लक अनुदानामधील उपरोक्त नमूद रु.४,०७,०००/- (अक्षरी रुपये चार लाख सात हजार फक्त) इतक्या रकमेची यंत्रसामुग्री खरेदीस मान्यता देण्याकरिता प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारास अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००७१४१२३८५४३११३ असा आहे. हे आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashvini Arvind Moon

Digitally signed by Ashvini Arvind Moon
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2799daf590db9c1313739c735ee1a1507d65ff767935a37efc0ea83014f7080c, serialNumber=5b80e03b84ee853744d97398ce98dea1b571f29e3698196de1076d43e3407b3b, cn=Ashvini Arvind Moon
Date: 2020.07.16 14:43:07 +05'30'

( अश्विनी मुन )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) महालेखापाल-२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
४) अधिष्ठाता, शासकीय आयुर्वेदीक व युनानी रसशाळा, नांदेड.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) निवड नस्ती (आयु-२)